**शासनाकडे किंवा क्षेत्रिय कार्यालयाकडे आलेल्या तक्रारी हाताळणेबाबत मार्गदर्शन.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि व पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्र: संकीर्ण-२०२१/२३४/प्र.क्र.०८/पदुम-१७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २४ सप्टेंबर, २०२१

**शासन परिपत्रक**

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, काही सामाजिक कार्यकर्ते किंवा इतर व्यक्ती ज्या शासनाकडे किंवा क्षेत्रिय कार्यालयाकडे काही विषय/प्रकरणांबाबत तक्रारी करतात. परंतु त्या विषयाबाबत कोणतीही शहानिशा न करता/कोणतेही पुरावे न जोडता/कागदोपत्री दस्तऐवज गोळा न करता फक्त वैयक्तिक द्वेष भावनेतून किंवा फक्त त्रास देण्याच्या हेतूने किंवा इतर कारणांमुळे १-२ पानांची तक्रार करतात. सामान्य प्रशासन विभागाने यापूर्वीसुध्दा तक्रार कशी करावी व निनावी तक्रार करु नये आणि तक्रारीसोबत कोणती कागदपत्रे जोडावी, असे वेळोवेळी आदेश काढले आहेत. तक्रार करणाऱ्या व्यक्तीने आपले नाव/पत्ता/दूरध्वनी क्रमांक/भ्रमणध्वनी क्रमांक /स्वत:च्या हस्ताक्षरात तक्रार करणे आवश्यक असते, परंतु असे होत नाही असे निदर्शनास आले आहे.

काही कर्मचारी संघटना आपल्या Letter Pad वर तक्रार करतात आणि कोणतेही पुरावे/कागदपत्रे जोडीत नसल्यामुळे तक्रारींची शहानिशा करणे शक्य होत नाही आणि शासनाच्या क्षेत्रिय कार्यालयाचा वेळ वाया जातो. त्यामुळे जर कोणतीही निनावी तक्रार आली किंवा पुराव्याशिवाय तक्रार आली तर त्याची दखल घेतली जाणार नाही, ही बाब संबधित तक्रारकर्त्याच्या निदर्शनास आणावी आणि प्रकरण बंद करावे.

जर तक्रार विहित पध्दतीने केली आहे, निनावी नसेल आणि सोबत योग्य कागदपत्रांचे पुराव जोडलेले असतील तर अशा प्रशासकीय दिरंगाईबाबतची तक्रारींची शहानिशा सक्षम प्राधिकारी यांनी करावी. काही प्रकरणांत आवश्यकता असल्यास, प्रादेशिक उपायुक्त यांनी आपल्या अधिनस्त काही जिल्हयांच्या तक्रारींची चौकशी आपल्या अधिनस्त इतर जिल्हयांच्या यंत्रणेमार्फत करुन घ्यावी. जेणेकरुन योग्य वस्तुस्थिती समोर येण्यास मदत होईल.

काही गुन्हेगारी स्वरुपाच्या तक्रारी आल्यास, त्या त्यांचेशी संबधित राज्य महिला आयोग/राज्य बालहक्क आयोग/पोलिस यांच्याकडे पाठवाव्यात. तसेच भ्रष्टाचाराची तक्रार असेल तर लाचलुचपत प्रतिबंधक विभाग (Anti Corruption Bureau) यांच्या क्षेत्रिय कार्यालयाकडे वर्ग करावी आणि त्याचा अहवाल मागवावा आणि अहवालासह शासनाकडे योग्य कार्यवाहीसाठी पाठवावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०२१०९२४१६१२१९२७०१** असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrinivas Jagannath Shastri

Digitally signed by Shrinivas Jagannath Shastri
DN: c=IN, o=Personal, title=2388, pseudonym=ca8d31b3edf9920fda8c1d0f5f135a08db96d9d5160524 54832375d63a281822, postalCode=410210, st=Maharashtra, serialNumber=c02f19ac7e7ab3a50d817c95cf483e33229cf0cbb03283 b175900630f81d2337, cn=Shrinivas Jagannath Shastri
Date: 2021.09.24 16:12:39 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास,वरळी, मुंबई.
३. आयुक्त, मत्स्यव्यवसाय विकास,तारापोरवाला मत्स्यालय, नेताजी सुभाष रोड, चर्नीरोड, मुंबई-४००००२.
४. सह सचिव/उप सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अवर सचिव/कक्ष अधिकारी (पदुम),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव(पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सर्व प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन/दुग्धव्यवसाय विकास/ मत्स्यव्यवसाय विकास
८. सर्व प्रादेशिक उपायुक्त / सहाय्यक आयुक्त,
९. निवडनस्ती (पदुम-१७),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.